**श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाचे बल्लारपूर, जि.चंद्रपूर या ठिकाणी उप परिसर (Sub Campus) सुरु करण्यासाठी मौजे विसापूर, ता. बल्लारपूर, जि.चंद्रपूर येथील महापारेषणच्या ताब्यात असलेली २० हेक्टर जमीन महसूल व वन विभागाकडे समर्पित/ प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: व्हिआयपी-२०२३/प्र.क्र.११७/ऊर्जा-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : ३० जून, २०२३

**संदर्भ :** १) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१ यांचे पत्र क्र.CMD/ MSETCL/ CIVIL/ २५०३, दिनांक १३.०४.२०२३

२) जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्र. कावि/मशा/जमीन/आर.बी-३/२०२२/११४५, दिनांक ०२.१२.२०२२

**प्रस्तावना -:**

अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.मुंबई यांचे दिनांक १३.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाचे बल्लारपूर, जि.चंद्रपूर या ठिकाणी उप परिसर (Sub Campus) सुरु करण्यासाठी मौजे विसापूर, ता. बल्लारपूर, जि.चंद्रपूर येथील महापारेषणच्या ताब्यात असलेली सर्वे क्र.४६६ मधील २० हेक्टर जमीन महसूल व वन विभाग परिपत्रक क्रमांक, जामिन ०४/२००६/प्र.क्र. ३५/ज १, दिनांक ०८.०९.२००८ नुसार महसूल व वन विभागाने अंतिम केलेल्या अटी व शर्तीनुसार महसूल व वन विभागाच्या सहमतीने उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली. या संबधित महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सूत्रधारी कंपनीच्या संचालक मंडळ यांची दिनांक २७.०३.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत ठराव क्र. १२/१०५ अन्वये खालील ठराव पारित केला आहे:-

"To spare the 20 Hectare of land by MSETCL to SNDT University for establishment of its sub-campus subject to final approval of Revenue & Forest Dept., Govt. of Maharashtra and as per such terms & conditions as may be finalised by the said Department."

त्यानुसार प्रस्ताव महसूल व वन विभागास सादर केला असता महसूल व वन विभागाने सदर जमीन महसूल व वन विभागास समर्पित/ प्रत्यार्पित करण्यास दिनांक २६.५.२०२३ अन्वये मान्यता दिली आहे. तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभागाने श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाचे बल्लारपूर, जि.चंद्रपूर हे "सार्वजनिक प्रयोजन (Public Purpose)" असल्याचे दिनांक ०७.०६.२०२३ अन्वये खात्री केली आहे. त्यानुसार, प्रस्तावित जमीन श्रीमती नाथीबाई दामोदर

ठाकरसी महिला विद्यापीठ बल्लारपूर, जि.चंद्रपूर यांना हस्तांतरित करण्याकरिता महसूल व वन विभागाकडे समर्पित/ प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विदयापीठ, बल्लारशाहा हे सार्वजनिक प्रयोजन असल्याने, महापारेषण कंपनीच्या ताब्यात असलेली मौजे विसापूर ता. बल्लारपूर जि. चंद्रपूर येथील सर्वे क्र. ४६६ मधील ७५.४८ हेक्टर जमिनीपैकी २० हेक्टर इतकी जमीन श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ यांना बल्लारशाह, जि. चंद्रपूर या ठिकाणी नवीन उप परिसर(Sub Campus) सुरु करण्याकरीता महसूल व वन विभागास खालील अटी-शर्तीच्या व महसूल व वन विभाग यांच्या रितसर अंतीम अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रत्यार्पित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. विद्यमान ६६ के.व्ही. बल्हारशाह-बी.पी.एम. लाईन स्थलांतरित करणे आवश्यक असल्यास, हे काम श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाच्या विनंतीनुसार आणि वास्तविक मार्ग सर्वेक्षणानुसार आणि विद्यमान लाईनच्या स्थलांतरासाठी येणारा अंदाजित खर्च रु. ६ कोटी इतका विद्यापीठामार्फत करण्यात यावा. सदर रु. ६ कोटी रक्कम विद्यापीठाने आगाऊ स्वरुपात महापारेषण कंपनीकडे जमा करावी.

२. महाराष्ट्र शासन वन विभाग किंवा जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी महापारेषण कंपनीद्वारे यापूर्वी दि.०७/१२/२०१५ रोजी बोटॅनिकल गार्डनसाठी हस्तांतरित केलेल्या २० हेक्टर जमिनीच्या रु.१८ कोटी मूल्याची पर्यायी जमीन हस्तांतरित केलेली नाही. सदर जमिनीच्या मोबदल्यात महसूल व वन विभागाने महापारेषण कंपनीला दिनांक ०७.१२.२०१५ पासून रु. १८ कोटी इतकी रक्कम व्याजासह किंवा त्या जमिनीच्या बदल्यात पर्यायी जमीन उपलब्ध करुन द्यावी.

२. सदर शासन निर्णय महसूल व वन विभाग यांची दिनांक २६.०५.२०२३ रोजीची टिप्पणी तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांची दिनांक ०७.०६.२०२३ रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६३०१६०७२२८२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN BHAGWAN SURVE

Digitally signed by NITIN BHAGWAN SURVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=bc82538eecb9538e00f76d0be3b13050503fc13c8f2f380f15ec8bb20d4d9e79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6A3C8B7B9BFDA7274C3A26715E841EE7E5760FA3B4D3AB6D9F4466E893219110, cn=NITIN BHAGWAN SURVE
Date: 2023.06.30 16:09:07 +05'30'

**(नितीन सुर्वे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१)मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

२)मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

३)मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

४) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय ,मुंबई

५) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग , मंत्रालय मुंबई.

६) प्रधान सचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय मुंबई

७) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या., एच.एस.बी.सी, मुंबई-३२

८) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

९) जिल्हाधिकारी, चंद्रपूर

१०) निवडनस्ती (ऊर्जा-४)